# बुकर टी. वॉशिंग्टन

जान ग्लेटियर आणि कॅथलीन थॉंपसन
मराठी अनुवाद : नीलांबरी जोशी



१८५६ साली जेव्हा व्हर्जिनिया या अमेरिकेतल्या राज्यात वसंत ऋतू होता तेव्हा एका मोठ्या शेतमळ्यात एका मुलाचा जन्म झाला. प्लांटेशन या नावानं ओळखल्या जाणाऱ्या त्या ठिकाणी त्या मुलाचे आई वडिल दोघेही गुलाम होते. त्यामुळे तो लहान मुलगाही आपोआप गुलाम ठरला. त्याचं नाव होतं – बुकर.





बुकर आपली आई आणि धाकटा भाऊ जॉन यांच्याबरोबर एका लहानशा खोपटात रहात होता. तिथे जमीन मातीची होती. खिडक्यांना काचाही नव्हता. तशाच परिस्थितीत काही वर्षांनंतर बुकरला अजून एक धाकटी बहीण आली – अमंडा..!



ब-याच वेळा त्यांना दिवसातून एकदाच खायला मिळायचं. शेतातली जनावरं खायची तोच मका ही मुलंही खात असत. तरटाच्या टोचणा-या कापडाचा एकच शर्ट बुकरकडे होता. तो जरा मोठा झाल्यावर तो शर्ट खूपच तोकडा व्हायला लागला. तेव्हा कुठे त्याला दुसरा शर्ट मिळाला. पण एका वेळी त्याच्याकडे एकच शर्ट असायचा.



नवीन शर्ट खूप टोचायचा. त्यामुळे बुकरला त्या शर्टचा रागच यायचा. त्याचं अंग खाजायचं. पण बुकरच्या प्रेमळ भावामुळे हा त्रास जरा कमी व्हायचा. बुकरचा नवीन शर्ट काही काळ जॉन वापरायचा. जॉनच्या अंगावर त्यामुळे चरे उमटायचे. पण मग जरा मऊ झाल्यावर तो शर्ट बुकर वापरायचा.



सगळ्याच गुलामांना फार्मवर काही ना काही काम करावंच लागायचं. बुकरची आई मालकाच्या घरी स्वयंपाक करायची. मालकाचं घर चिक्कार मोठं होतं. पण बुकरची आई आपल्या खोपटातच मालकाच्या घरच्यांसाठी अन्न शिजवायची. त्यामुळे ती झोपडी थंडीत उबदार होत असली तरी उन्हाळ्यात मात्र काहिली व्हायची. बुकरची आई चिकन शिजवल्यावर थोडं घरात मुलांना द्यायची. कधीकधी बुकरला बटाटा किंवा एक कप दूध नाश्त्याला मिळायचं.

छोट्या बुकरला फार्मवर वेगवेगळी कामं करायला लागायची. कधी तो शेतात राबणा-या मजुरांना पाणी नेऊन द्यायचा. गिरणीतून मका दळून आणायचा असेल तर मात्र तो दूरवरच्या गावात घनदाट जंगल पार करुन जायचा. परत येईपर्यंत काळोख होऊन गेलेला असे. मालकांच्या घरातल्या मुली शाळेत शिकायला जायच्या. बुकर त्यांची दप्तरं शाळेपर्यंत घेऊन जायचा. पण त्याला शाळेत आत जायची परवानगी नव्हती.



१८६५ साली बुकर नऊ वर्षांचा असताना अमेरिकेत गुलाम मुक्त झाले. गुलामगिरीतून सुटका व्हावी अशी इच्छा असणा-यात्याच्या आईला त्यानं त्या दिवशी रात्री देवाची प्रार्थना करताना पाहिलं. पुढे काय वाढून ठेवलंय त्याचा बुकरला पत्ताच नव्हता.

बुकरच्या आईनं आधी एका गुलामाबरोबर लग्न केलं होतं. तो गेल्यावर दुस-याशी लग्न केलं तो गुलाम जवळच्या एका शेतावर राबायचा. नंतर तो व्हर्जिनियाच्या पश्चिमेला निघून गेला. त्यानंतर काही दिवसांनी आपल्या कुटुंबाला तिकडे येण्यासाठी त्यानं एक गाडी आणि काही खेचर पाठवले.

व्हर्जिनियाच्या त्या पश्चिम भागात पोचायला बुकर आणि त्याच्या कुटुंबियांना दोन आठवडे लागले. गाडीत गरजेच्या वस्तू भरल्या होत्या. त्यामुळे चढावर मुलांना गाडीमागून चालत यावं लागलं. अखेरीस ते मॉल्डनला पोचले. तिथलं घर फारसं बरं नव्हतं. खरं तर आधीच्या घरापेक्षाही ते मोडकळीस आलेलंच होतं.



बुकरचे सावत्र वडील मिठाच्या खाणीवर काम करायचे. मोठ्या ड्रम्समध्ये मीठ भरण्याचं काम ते करत. त्यामुळे बुकर आणि त्याचा भाऊ जॉनदेखील त्याच खाणीत रोजंदारीवर लागले.



एक दिवस बुकरनं एका युवकाभोवती कोंडाळं करुन उभे असलेले अनेकजण दिसले. तो युवक भोवतालच्या लोकांना वर्तमानपत्र वाचून दाखवत होता. मजुरांना लिहिता वाचता येत नसल्यामुळे ते लक्षपूर्वक बातम्या ऐकत होते. तेव्हा शिक्षणाचं महत्व बुकरला पहिल्यांदा लक्षात आलं. लोक शिकले तर त्यांचे विचार बदलतील हे प्रथम त्यानं तेव्हा जाणलं. नंतर बुकरनं निर्धारानं आधी स्वत: शिकायचा निर्णय घेतला. जितकं शिकता येईल तितकं शिकायचं असं त्यानं पक्कं ठरवलं.

बुकरच्या आईनं यासाठी त्याला मदत केली. तिनं “वेबस्टर ब्लू बॅकड स्पेलर“ हे पुस्तक विकत घेतलं. बुकरला त्यातून अक्षरओळख झाली. सर्वप्रथम तो १८ हा आकडा ओळखायला शिकला. मिठाच्या खाणीत प्रत्येक ड्रमवर तो आकडा कोरलेला होता.

बुकरला खूप शिकायचं होतं. तशाच त्याच्या घराजवळच एका शिक्षकानं नवीन शाळा सुरु केली होती. त्या शाळेत जायची बुकरची तीव्र इच्छा पाहून त्याच्या सावत्र वडिलांनी त्याला शिकायची परवानगी दिली. पण सकाळी पाच तास आणि शाळेतून आल्यावर दोन तास त्याला खाणीत काम करावं लागायचं. वडिलांची तशी अटच होती.






वर्गात शिक्षकांनी सगळ्या मुलांना नावं विचारली. बुकरनं पाहिलं तर सगळेजण नाव आडनाव असं सांगत होते. मग त्याची पाळी आल्यावर त्यानं नाव सांगितलं – बुकर वॉशिंग्टन. अनेक वर्षांनंतर आपलं आडनाव टालियाफेरो असल्याचं त्याला कळलं. मग तो बुकर टी वॉशिंग्टन अशा नावानं ओळखला जायला लागला. शाळेत बुकर लिहायला-वाचायला शिकला.







बुकर टी वॉशिंग्टन या पूर्ण नावापलीकडे शाळेकडून बुकरच्या खूप सा-या अपेक्षा होत्या. त्याला शाळेत जाणं चालू ठेवायचं होतं. पण तेवढ्यात त्याच्या सावत्र वडिलांनी बुकरला पूर्ण वेळ कामावर जायला सांगितलं. पण बुकर शाळा सोडून एका कोळशाच्या खाणीत काम करायला लागला.

कोळशाची खाण आतून काळोखी, गलिच्छ आणि अत्यंत असुरक्षित होती. बुकरला कामातून कधीही वेळ मिळाला तरी तो आपल्याकडचं एकुलतं एक पुस्तक वाचत बसायचा. कोळशाच्या खाणीतल्या मिणमिणत्या दिव्याच्या उजेडातही तो वाचायचा. रात्री मैलोनमैल चालत एखाद्या शिक्षकाकडे जाऊन शिकायचा.

खाणीत काम करत असताना बुकरनं एक दिवस हँपटन इन्स्टिट्यूटचं नाव ऐकलं. तिथे कृष्णवर्णींयासाठी ट्रेड-स्कूल होतं. कृष्णवर्णीय लोक तिथे नोकरीत लागणारी कौशल्यं शिकत असत. बुकरनं त्या शाळेत जायचं ठरवलं.



१८७१ साली बुकर पंधरा वर्षांचा झाला. तेव्हा त्याला व्हियोला रुफिन साठी काम करायची संधी मिळाली. ती खाणमालकाची बायको होती. व्हियोलाला खुष करणं अवघड होतं. पण खाणीत काम करण्यापेक्षा ते सोपं असल्यानं बुकरला तिच्याकडे काम करुन पहायचं होतं.



व्हियोला रुफिननं त्याला एक शेड साफ करायला सांगितली. त्यानं ते काम भराभर संपवलं. पण तिला ते काम काही पसंत नव्हतं. मग बुकरनं तिच्या सांगण्यावरुन अनेकदा ती शेड स्वच्छ केली. त्यानंतर फरशा चमकायला लागल्या आणि खिडक्यांच्या काचेवरचे डाग नाहीसे झाले. खोलीतली सगळी अवजारं हारीनं मांडून ठेवली. तेव्हा व्हियोला रुफिन खुष झाली.

बुकरनं तिच्याकडे दीड वर्षं काम केलं. तिला एकही डाग चालत नसे. पण ती बुकरच्या शिक्षणाबद्दल त्याच्याशी चर्चा करायची. काम संपल्यावर शाळेत पाठवायची.

१८७२ साली बुकर हँपटन इन्स्टिट्यूटमध्ये शिकायला व्हर्जिनियाच्या पूर्वेकडच्या भागात गेला. मुलगा दूर गेल्यानं त्याच्या आईला खूप दु:ख झालं. पण आपल्या मुलानं चांगल्या शाळेत शिकावं असं तिला वाटत होतं. बुकरनं दरम्यान काही पैसे जमा करुन ठेवले होते. शेजा-यापाजा-यांनीही त्याला काही पैसे दिले. तरीही शाळेपर्यंत पोचायला आणि फी भरायला त्याच्याकडे पुरेसे पैसे नव्हतेच.







त्याच्याकडे घोडागाडीतून जायला पैसे उरले नाहीत तेव्हा तो चालत गेला. रिचमंड या शहरात पोचल्यावर रात्री रस्त्याच्या कडेच्या बाकावर झोपला. त्याच्याकडे खायलाप्यायलाही पैसे नव्हतेच. दुस-या दिवशी एका जहाजात माल भरायचं काम त्याला मिळालं. ते काम करुन त्यानं पैसे मिळवले. थोडंसं खाऊन उरलेले पैसे हँपटनसाठी राखून ठेवले.



हँपटनमध्ये प्रवेश मिळवण्यासाठी अनेक तरुणांनी तिथे गर्दी केली होती. इतक्या जणांना प्रवेश मिळणं केवळ अशक्य होतं. बुकर तिथे सहाय्यक प्रिन्सिपल मिस मेकी हिला भेटला. तिच्याशी जे काही संभाषण झालं त्यावर तिला बुकरबद्दल खात्री वाटेना. शाळेची फी द्यायची तर बुकरला काम करायला लागणार होतं. मात्र तो थकलेला दिसत होता. त्याचे कपडेही धुळीनं माखलेले होते. पण त्याच्यात काहीतरी विलक्षण होतं. मेकीनं त्याला बाजूला थांबायला सांगितलं.

बुकर तिथे पुढचे काही तास वाट पहात बसला. काही विद्यार्थ्यांना शाळेत प्रवेश मिळालेला त्याला दिसला. काहीजण परत गेले. शेवटी मिस मेकी त्याला म्हणाली.. “हा झाडू घेऊन माझी खोली स्वच्छ कर.”

बुकर पुस्तकं वाचून खूप काही शिकला होता. कोणतंही काम नीटनेटकं कसं करायचं तेही त्याला अवगत होतं. त्यानं ती खोली तीन वेळा झाडली. चार वेळा पुसली. फर्निचर हलवून जमीन नीट पुसून घेतली. खोलीचा कानाकोपरा स्वच्छ केला. काम झाल्यावर ते सांगायला तो मेकीकडे गेला.

मेकीनं आपला रुमाल एका टेबलावर जरा घासला. त्यावर धुळीचा कणही नव्हता. “ठीक, आता तुला शाळेत प्रवेश मिळाला..” असं ती बुकरला म्हणाली.



बुकर टी वॉशिंग्टन हँपटन इन्स्टिट्यूटमध्ये मन लावून शिकला. अनेक कौशल्यं प्राप्त करुन घेतली. तिथे त्यानं शेतीपासून विटा बनवण्यापर्यंत सगळं शिकून घेतलं.
वक्तृत्वकला देखील त्याला जमायला लागली. गणित, विज्ञान, इतिहास असे विषयही त्याला समजले. हँपटनमधलं शिक्षण संपल्यावर बुकर एक शिक्षकाचं काम करायला लागला. दोन वर्षांनंतर तो एका शाळेचा प्रिन्सिपल झाला. ती शाळा अलाबामा राज्यातल्या टस्कगी या ठिकाणी होती.






१८८१ साली बुकर टस्कगीमध्ये आला. तिथे ना शाळेची इमारत होती, ना शिक्षक होते.. ना विद्यार्थी.
पण बुकर निराश झाला नाही. त्यानं आजूबाजूच्या गावांमधून विद्यार्थी गोळा केले. एका पुरातन चर्चमध्ये शाळा सुरु केली. पावसाळ्यात चर्च गळायचं तेव्हा विद्यार्थ्यांना डोक्यावर छत्री घेऊन शिकायला लागायचं. पण बुकर न डगमगता शिकवत राहिला.
जुन्या चर्चमध्ये सुरु झालेली ही शाळा ही तर फक्त एक सुरुवात होती. बुकर टी वॉशिंग्टननं मनात एका भव्य शाळेचं स्वप्न पाहिलं होतं.

नंतरच्या काळात टस्कगीमध्ये बुकरच्या कल्पनेपलीकडची भव्य शाळा उभी राहिली. १९१५ साली टस्कगी इन्स्टिट्यूटमध्ये साधारण १०० इमारती आणि १५०० विद्यार्थी होते. शाळेतल्या पारंपारिक विषयांबरोबरच ते ३९ प्रकारची कौशल्यंही आत्मसात करत होते.
टस्कगी इन्स्टिट्यूटमध्ये विद्यार्थ्यी उपयोगाच्या अनेक गोष्टी शिकले. बुकर टी वॉशिंग्टननं आपल्या विद्यार्थ्यांना कायम खूप मन लावून शिकवलं.

## महत्वाच्या तारखा

| | |
|---|---|
| १८५६ | व्हर्जिनिया, अमेरिका या ठिकाणी प्लांटेशनवर गुलाम म्हणून जन्म |
| १८६५ | गुलामगिरीतून मुक्तता. बुकरचे कुटुंबिय वेस्ट व्हर्जिनियामध्ये स्थायिक झाले. तिथे खाणींवर त्यानं काम केलं. |
| १८७१ | मिसेस व्हियोला रुफिन या खाणमालकाच्या बायकोबरोबर काम केलं. तिनं बुकरला मदत करुन काम संपल्यावर शाळेत जायला प्रोत्साहन दिलं. |
| १८७२-७५ | व्हर्जिनियाच्या हँपटन इन्स्टिट्यूटमध्ये शिक्षण घेतलं. |
| १८७९ | हँपटन इन्स्टिट्यूटमध्ये शिक्षकाच्या कामावर रुजू |
| १८८१ | टस्कगी इन्स्टिट्यूट, अलाबामा या ठिकाणी प्रिन्सिपल |
| १९०१ | “अप फ्रॉम स्लेव्हरी” हे आत्मचरित्र प्रकाशित झालं. |
| १९१५ | निधन. तेव्हा बुकर टस्कगी इन्स्टिट्यूचा अध्यक्ष होता. |